घाटकोपर येथे नगर भूमापन क्र.१९४/ब या शासकीय भूखंडावर खाजगीकरणाच्या माध्यमातून बांधण्यात येत असलेल्या शासकीय इमारतींचे वाटप करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : शानिवा-२५१२/प्र.क्र.२५०/१२/२३-अ
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
तारीख : २९ ऑक्टोबर, २०१५

## शासन निर्णय

**प्रस्तावना -**

घाटकोपर, मुंबई येथील नगर भूमापन क्र.१९४/ब, पी. डब्ल्यू. डी. ग्राऊंड, घाटकोपर-मानखुर्द लिंक रोड, घाटकोपर (पूर्व), मुंबई-८९ या शासकीय भूखंडाचा खाजगीकरणाच्या माध्यमातून विकास करण्याचे काम प्रगतीपथावर आहे. या प्रकल्पांतर्गत विकासक शासनास खालीलप्रमाणे १० इमारती बांधून देण्याची कार्यवाही करीत आहेत : -

| अ.क्र. | इमारत क्रमांक | निवासस्थानांची संख्या | चटई क्षेत्रफळ (चौ.फू.) |
|---|---|---|---|
| १ | १ | ७६ | ६८८ |
| | | ३८ | ८३१ |
| २ | २ | १५६ | ५४० |
| ३ | ३ | १६२ | ५४० |
| ४ | ४ | १६२ | ४२० |
| ५ | ५ | १४१ | ४२० |
| ६ | ६ | ५४ | ३८० |
| ७ | ७ | ५४ | ३८० |
| ८ | ८ | ५४ | ३८० |
| ९ | ९ | १६२ | ४२० |
| १० | १० | १६२ | ४२० |
| एकूण | | १२२१ | |

वरील इमारतींपैकी इमारत क्र. ६, ७ व ८ यापूर्वीच बांधून पूर्ण झाल्या असून, सदर इमारतींमधील एकूण १६२ निवासस्थाने “सेवा निवासस्थाने” म्हणून शासकीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांना वाटप करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या निवासस्थानविषयक पूलवर वर्ग करण्याचा निर्णय शासनाने माहे ऑगस्ट, २०१३ मध्ये घेतला आहे. त्यानुसार सदर तिन्ही इमारतींचा ताबा कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सा.बां.) विभाग, अंधेरी, मुंबई यांच्या वतीने उप अभियंता, (सा.बां.) उप विभाग, कुर्ला यांनी घेतला आहे. वर नमूद करण्यात आलेल्या तिन्ही इमारती देखभाल, दुरुस्ती व परिरक्षणासंबंधीच्या कामाकरिता कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सा.बां.) विभाग, अंधेरी, मुंबई यांच्या ताब्यात आहेत. सदर इमारतींचा ताबा सार्वजनिक बांधकाम विभागातर्फे प्राप्त करण्यात आल्यानंतर उपरोक्त तिन्ही इमारतींमधील एकूण १६२ सेवा निवासस्थानांचे वाटप सामान्य प्रशासन

विभागाने प्रतिक्षायादीनुसार गट- ब व गट-क च्या अधिकारी /कर्मचाऱ्यांना करण्याबाबतची कार्यवाही माहे सप्टेंबर, २०१३ पासून सुरु केली आहे.

उपरोक्त १० इमारतींपैकी उर्वरित ७ इमारतींचे वाटप (इमारत क्र. १ ते ५, ९ व १० ) करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** -

२. शासनाने आता वर उल्लेख केलेल्या ७ इमारतींचे वाटप खालीलप्रमाणे करण्याचे निर्णय घेतले आहेत :-

**अ)** इमारत क्र. १ ते ५ व इ.क्र.९ या ६ इमारतींमधील एकूण ८९७ निवासस्थाने, शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यांना "सेवा निवासस्थाने" म्हणून वाटप करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या निवासस्थानविषयक पूलवर वर्ग करण्यात येत आहेत.

**ब)** पोलीस आयुक्त, लोहमार्ग,चर्चगेट, मुंबई यांनी त्यांच्या आस्थापनेवरील राज्य पोलीस कर्मचाऱ्यांसाठी शासकीय सेवा निवासस्थानांची केलेली मागणी विचारात घेता इमारत क्र.१० मधील १६२ निवासस्थाने पोलीस आयुक्त, लोहमार्ग, चर्चगेट, मुंबई यांच्या कार्यालयाकडे "सेवा निवासस्थाने" म्हणून विहित कार्यपध्दतीनुसार वाटप करण्यासाठी वर्ग करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक **२०१५१००६१६०९२०६५०७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2015.10.29 13:03:39 +05'30'

**(भा. र. गावित)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई - ४०० ००६.
२.सर्व सन्माननीय संसद सदस्य / विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
३.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
५.सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
६.मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
७.मा.उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
८.मा.सभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
९.मा.उपसभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
१०.मा.विरोधी पक्षनेता, (विधान सभा) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.

११.मा.विरोधी पक्षनेता, (विधान परिषद ) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
१२.मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३. मा. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.प्रधान सचिव , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई - ४०० ०३२.
१५.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१६.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई .
१७.प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई.
१८.प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई.
१९.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई.
२०.सचिव, लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने).
२१. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
२३. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२४. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
२५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२६. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई.
२७. पोलीस आयुक्त, लोहमार्ग, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालय, चर्चगेट स्टेशन बिल्डींग, पहिला माळा , महर्षी कर्वे रोड, चर्चगेट, मुंबई - ४०० ०२०.
२८. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३१. अधीक्षक अभियंता, मुंबई मंडळ, मुंबई.
३२. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, २५, मर्झबान पथ, मुंबई-४०० ००१.
३३. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई-४०० ०१८.
३४. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी (प.), मुंबई - ४०० ०५८.
३५. सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबई, जुने जकात घर, मुंबई -४०० २३.
३६. सर्व मंत्रालयीन विभाग.
३७. सर्व विभागीय आयुक्त.
३८. बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
३९. निवड नस्ती.